20150423152342362 7

(२७८)

झोळांबे खारभूमी योजना ता.रोहा, जि.रायगड या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- खाभूयो २००९/(३९९/२००९)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २८/०२/२०११

पहावे :- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्रमांक ३८०६/खाभू/झोळांबे/ ता-२(१)/८२९५, दिनांक २४/१२/२००९

प्रस्तावना :-

झोळांबे खारभूमी योजना ता.रोहा, जि.रायगड ही योजना बृहत आराखडयात समाविष्ट असून या योजनेस शासन निर्णय दिनांक २४/०८/२००४ अन्वये रु.१३३.४० लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी दिनांक ३१/०१/२००६ अन्वये रु.११९.९५ लक्ष किंमतीस तांत्रिक मान्यता दिली होती. दिनांक २५/०७/२००५ ते दिनांक २७/०७/२००५ दरम्यानच्या महापूरामुळे मोठया प्रमाणात धूप झाली व त्यामुळे बांधाच्या परिमाणात वाढ झाली. तसेच दरसूचीतील फरक व इतर कारणांमुळे वाढ झाली. सदर योजनेचे सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी शासनास सादर केला होता. तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

झोळांबे खारभूमी योजना ता.रोहा, जि.रायगड या योजनेस कामाच्या एकूण अंदाजित रुपये २,११,३३,१४६/- (रुपये दोन कोटी, अकरा लक्ष, तेहत्तीस हजार, एकशे शेहचाळीस फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रुपये १,९२,११,९५१/- व रुपये १९,२१,१९५/- अनुषंगिक खर्च या रक्कमेस सुधरित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना (१) बांधकामे योजनांतर्गत" या लेखाशीर्षखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

D:\2010\kharbhumi\Patil\suprama gr.doc

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१५.५.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१००६/प्र.क्र.(८२/०६) विनियम दि.१३.३.२००७ मधील तरतूदीनुसार आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (१५/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे (सोबत अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, खारभूमी सर्वेक्षण व अन्वेषण विभाग, पेण, जि.रायगड
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ आज्ञा १ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
**खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.**